राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY-RAFTAR अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता सन २०२२-२३ मधील सर्वसाधारण प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४४२२/प्र.क्र.१५७/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १७ फेब्रुवारी, २०२३

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या संकेत स्थळावरील राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. ०३१७/प्र.क्र.१८/राकृवियो कक्ष, दि. १३.४.२०१७
३. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र.१-१/२०२०-RFS-III(८२६३२), दि. १२.४.२०२२
४. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. १-१/२०२०-RFS-III, दिनांक २३.६.२०२२
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राशेअ ४४२२/प्र.क्र. १२०/८ अे, दिनांक १४.७.२०२२
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राशेअ ४४२२/प्र.क्र. १५७/८ अे, दिनांक १३.९.२०२२
७. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र. १-२१/२०१८-RFS-III(pt), दि. २.२.२०२३
८. कृषि आयुक्तालयाचे क्र. वि.प्र.३/कोक्षेवि/अनु./४३१२/२३, दिनांक ६.२.२०२३

**प्रस्तावना :-**

मागील आर्थिक वर्षापर्यंत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास (Rain fed Area Development) कार्यक्रम अंमलबजावणी करण्यात येत होती. तथापि, केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) हा कार्यक्रम राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY कॅफ्टेरिया अंतर्गत घेण्याबाबत सूचित केले आहे. त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये सन २०२२-२३ या वर्षासाठी केंद्र हिस्सा रु.२०००.०० लाख व राज्य हिस्सा रु.१३३३.०० लाख अशा एकूण रु. ३३३३.३३ रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार विभागाने संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमाच्या वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे. कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रम (RAD) सन २०२२-२३ करीता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु.२०००.०० लाख व राज्य हिस्सा रु.११०२.०१ लाख अशी एकूण रु.३१०२.०१ लाख रकमेची अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये या योजनेसाठी प्राप्त पहिल्या हप्त्याचा केंद्र हिस्सा रु.३९४.०० लाख व त्यास समरुप राज्य हिस्सा रु. २६२.६७ लाख असा एकूण रु.६५६.६७ लाख निधी वितरीत केला आहे.

केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण विभागाने संदर्भ क्रमांक ७ येथील दिनांक २.२.२०२३ च्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना RKVY-RAFTAR अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) योजनेअंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाकरिता रु. ३९४.०० लाख निधी राज्य शासनाकडे वितरीत केला आहे. कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र. ८ च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी सन २०२२-२३ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गाकरिता दुसऱ्या हप्त्याचा केंद्र हिश्श्याचा रु.३९४.०० लाख व राज्य हिश्श्याचा रु. २६२.६७ लाख असा एकूण रु.६५६.६७ लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमासाठी RKVY-RAFTAR अंतर्गत सन २०२२-२३ मध्ये आयुक्त (कृषि) यांना सर्वसाधारण प्रवर्गाकरिता दुसऱ्या हप्त्याचा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

**( रू. लाखात)**

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|
| **सर्वसाधारण प्रवर्ग** | **३९४.००** | **२६२.६७** | **६५६.६७** |

२. सदर रु. ६५६.६७ लाख निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **सर्वसाधारण प्रवर्ग** | **मागणी क्र.डी-३,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>१०९-विस्तार व प्रशिक्षण,<br>०१-माहिती व प्रसारण,(०१)(५१)- कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (केंपुयो) (केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१ ९५५४) ३३, अर्थसहाय्य. | **मागणी क्र.डी-३,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>१०९-विस्तार व प्रशिक्षण,<br>०१-माहिती व प्रसारण,(०१)(५३)- कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान - अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (केंपुयो) (राज्य हिस्सा ४०%),<br>(२४०१ ए २७२) ३३- अर्थसहाय्य. |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी कोषागारामून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रक अधिकारी व सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय यांना आहरण व संतिरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी राज्य शासनास सन २०२२-२३ करीता मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण

करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

५. सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच संदर्भाधीन अ.क्र. २ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दिनांक १३ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार करावी.

६. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड व अनुदान मंजूरीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बॅक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे जमा करावी.

७. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

८. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सूचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सन २०२२-२३ करिता सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. ४ एप्रिल, २०२२ व ८ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२१७१२२०४२३६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2023.02.17 12:24:14 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०० ०३२.
२. विधान सभा/विधान परिषद सदस्य,
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

४. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र, मुंबई/नागपुर
११. महालेखापाल (लेखा परीक्षण) महाराष्ट्र, मुंबई/नागपुर
१२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१४. सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
१६. निवडनस्ती ८-अे.